**आर्मी इन्स्टिटयुट ऑफ टेक्नॉलॉजी (AIT), दिघी हिल्स, पुणे या संस्थेत शैक्षणिक वर्ष २०१५-१६ पासून एम.ई.मेकॅनिकल इंजिनिअरींग डिझाईन हा नविन पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम सुरु करण्यास मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्र.टीईएम-२०१५/१०२९/प्र.क्र.२८१/तांशि-४**

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२

दिनांक: ३ जून, २०१५.

वाचा :- १) शासन निर्णय, उच्च व तंत्राशिक्षण आणि सेवायोजन विभाग, क्रमांक पीईसी-२०९४/(६४२१)/तांशि-१, दि.५/८/१९९४

२) अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, नवी दिल्ली यांचे मान्यता पत्र क्र. वेस्टर्न/१-२४५३९०३०९८/२०१५/ईओए, दि.७/४/२०१५

३) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.२/एनजीपी मान्यता/२०१५/७३३, दि.२०/५/२०१५

**प्रस्तावना :**

आर्मी इन्स्टिटयुट ऑफ टेक्नॉलॉजी (AIT), दिघी हिल्स, पुणे या संस्थेत शैक्षणिक वर्ष २०१५-१६ पासून एम.ई.मेकॅनिकल इंजिनिअरींग डिझाईन हा नविन पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम सुरु करण्यास अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेने वरील वाचा १) येथील दिनांक ७/४/२०१५ च्या पत्रान्वये मान्यता दिली आहे. त्यानुसार शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन आर्मी इन्स्टिटयुट ऑफ टेक्नॉलॉजी, दिघी हिल्स, पुणे या संस्थेत एम.ई.मेकॅनिकल इंजिनिअरींग डिझायईन हा १८ प्रवेश क्षमतेचा नवीन पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम शैक्षणिक वर्ष २०१५-१६ पासून सुरु करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर मंजूरी कायम विना अनुदान तत्वावर राहील.

२) प्रस्तुत बाबतीत अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने विहित केलेल्या तसेच दिनांक २१ मे, १९८३ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटींची पूर्तता करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील. सदर अभ्यासक्रमासाठी संस्थेचे प्रवेक्षक्षमता वर नमूद केल्याप्रमाणे राहील.

३) शासनाने विहित केलेल्या तसेच अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेने विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत संस्थेस करारनामा करावा लागेल. तसेच संबंधित कागदपत्रांची आणि औपचारिक बाबींची पूर्तता संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्या संमतीने समाधानकारकरित्या करण्यात येईल.

४) सदर अभ्यासक्रमाच्या संलग्नीकरणासाठी संबंधित संस्थेने महाराष्ट्र राज्य विद्यापीठ अधिनियम,१९९४ मधील तरतूदीनुसार संबंधित विद्यापीठाची मान्यता/संलग्नीकरण घेणे आवश्यक राहील.

५) संबंधित संस्थेने संचालक, तंत्र शिक्षण यांचेकडे आवश्यक ती संचीत ठेव संयुक्त खात्यात भरुन इतर कायदेशीर बाबींची पूर्तता करावी.

६) शिक्षण शुल्क समितीने विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क संबंधित संस्थांनी आकारल्यास त्या संस्थांवर महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिट्यूशन (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ अनुसार कारवाई करण्यात येईल.

७) संस्थेने अभ्यासक्रम चालविण्यास पूर्णवेळ शिक्षकवृंद व इतर तांत्रिक कर्मचारी शासन नियमाप्रमाणे नियुक्त करावेत. त्यांना नियमानुसार वेतन व भत्ते देण्यात यावेत. तसेच शिक्षकवृंद व इतर कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्ते इत्यादीबाबत तसेच विद्यार्थ्यांकडून शासनाकडे तक्रारी आल्यास संस्थेवर कडक कारवाई करण्यात येईल.

८) संस्थेतील ग्रंथालयास आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या मानकानुसार खरेदी करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपूर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात विद्यार्थ्यांना अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या मानकाप्रमाणे सर्व शैक्षणिक सोयीसुविधा (उदा. प्रयोगशाळा, वाचनालय, वर्गखोल्या इ.) करणे आवश्यक आहे.

९) रॅगिंग संदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट, १९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करणेआवश्यक राहील.

१०) याशिवाय संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई व संबंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती लागू राहतील.

११) याशिवाय संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई व संबंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती लागू राहतील.

१२) संस्थेने संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्याकडे प्रोसेसिंग फी अदा केली नसल्यास संचालकांनी अंतीम मान्यता देण्यापूर्वी ती संस्थेकडून वसूल करावी.

२. आर्मी वेल्फेअर एज्युकेशन सोसायटी, नवी दिल्ली यांचेतर्फे आर्मी मधील सर्व्हिसमेन तथा एक्स-सर्व्हिसमेन यांच्या पाल्यांसाठी सदर संस्था सुरु करण्यात आली आहे. हया संस्थेच्या प्रवेशाबाबत मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट याचिका (सिव्हील) क्र. ३२५/१९९४ बाबत दिनांक १९-७-१९९४ अन्वये दिलेल्या आदेशानुसार संस्थेतील प्रवेश प्रक्रीया संबंधित संस्थेमार्फत राबविण्यात येईल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१५०६०३१४४४५८६९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Madan Maruti Morve

Digitally signed by Madan Maruti Morve
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Madan Maruti Morve
Date: 2015.06.24 12:49:20 +05'30'

**( म.मा.मोरवे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. सहसंचालक, तंत्र शिक्षण, विभागीय कार्यालय, पुणे (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
३. कुलगुरू, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे
४. संबंधित संस्था (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
५. अतिरिक्त सचिव (तांत्रिक), भारत सरकार, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, ७ वा मजला, चंद्रलोक भवन, जनपथ, नवी दिल्ली - ११० ००१.
६. सहायक शिक्षण सल्लागार (तांत्रिक), भारत सरकार, मनुष्यबळ विकास मंत्रालय (शिक्षण विभाग), नवी दिल्ली.
७. विभागीय अधिकारी, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, पश्चिम विभागीय कार्यालय, इंडस्ट्रियल इन्शुरन्स बिल्डींग, २ रा मजला, चर्चगेट, मुंबई.
८. निवड नस्ती-तांशि-४